अर्थसंकल्पिय अनुदान २०२०-२१
"२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने (०१)(०७) नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारी वर्ग (अनिवार्य) (२२१५१९१४) "मागणी क्रमांक वाय-२

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४२०/प्र.क्र.९३/पापु-२३**

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४००००१
तारीख: ५ नोव्हेंबर, २०२०

वाचा :-

१. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः संकीर्ण-२०२०/प्र.क्र.६२/कोषा प्रशा-५, दि.१ एप्रिल २०२०
२. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि. १६ एप्रिल,२०२०
३. शासन निर्णय, पा.पु.व स्व.वि., क्रमांकः बजेट-१४२०/प्र.क्र.९३/पापु-२३, दि. ११ जून, २०२०
४. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः संकीर्ण-१०२०/प्र.क्र.६२/२०/कोषा-प्रशा-५,दि.२८जुलै,२०२०
५. शासन निर्णय, पा.पु.व स्व.वि., क्रमांकः बजेट-१४२०/प्र.क्र.९३/पापु-२३, दि. १३ ऑगस्ट, २०२०

प्रस्तावना:-

जिल्हा परिषदेमधील ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारी वर्ग यांचे वेतन खर्च भागविण्यासाठी मागणी क्रमांक वाय-२ "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने (०१)(०७) नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारी वर्ग (अनिवार्य) (२२१५१९१४)" या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष २०२०-२१ करिता ३६, सहायक अनुदाने (वेतन) साठी रुपये

११,३०,७६,०००/- इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतुदीपैकी जिल्हा परिषदांना वेतनखर्चासाठी एकूण रुपये ३,६३,००,०००/- इतका निधी वाचा मधील अनुक्रमांक ३ व ५ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. आता संबंधित जिल्हा परिषदांचा सन २०२०-२१ मधील बिम्सप्रणालीवरील एकूण वेतनखर्च विचारात घेऊन जिल्हा परिषदांना पुढील वेतन अनुदान वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

जिल्हा परिषदेमधील ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारी वर्ग यांचे वेतन खर्च भागविण्यासाठी सन २०२०-२१ या वित्तीय वर्षासाठी “२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने (०१)(०७) नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारी वर्ग (अनिवार्य) (२२१५१९१४)” या लेखाशिर्षाखाली ३६, सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टाखाली रुपये १,३७,००,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी सदतीस लाख फक्त ) इतके अनुदान पुढीलप्रमाणे संबंधित जिल्हा परिषदांना वितरीत करण्यात येत आहे.

| अ. क्र. | जिल्हयाचे नाव | सन २०२०-२१ करीता लेखाशिर्ष २२१५१९१४ खाली वितरीत करण्यात येत असलेले अनुदान ३६,सहायक अनुदाने (वेतन) | या शासन निर्णयान्वये लेखाशिर्ष २२१५१९१४ खाली वितरीत करण्यात येत असलेले वेतन अनुदान (अक्षरी रुपये) |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | ठाणे | १०००००० | रूपये दहा लाख फक्त |
| २ | पालघर | २०००००० | रूपये वीस लाख फक्त |
| ३ | रत्नागिरी | ७०००००० | रूपये सत्तर लाख फक्त |
| ४ | सातारा | २००००० | रुपये दोन लाख फक्त |
| ५ | सांगली | १०००००० | रूपये दहा लाख फक्त |
| ६ | नांदेड | १०००००० | रूपये दहा लाख फक्त |
| ७ | यवतमाळ | १५००००० | रूपये पंधरा लाख फक्त |
| एकूण | | १३७००००० | रूपये एक कोटी सदतीस लाख फक्त |

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेले अनुदान शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहील. कोव्हीड-१९ मुळे निर्माण झालेल्या आरोग्य व आर्थिक आपत्तीवर मात करण्याच्या दृष्टीने राज्याची एकंदर आर्थिक परिस्थिती विचारात घेता, खर्चात काटकसर करणे तसेच काही खर्च पुढे ढकलणे गरजेचे आहे.

३. या शासन निर्णयामध्ये दर्शविण्यात आलेल्या रकमांपेक्षा अधिक खर्च होणार नाही याची दक्षता सर्व संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी. तसेच सदर निधी ज्या प्रयोजनासाठी आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च होईल याचीही दक्षता घेण्यात यावी.

४. सदर शासन निर्णयान्वये तसेच यापूर्वी वितरित केलेल्या निधीची उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर केल्याची खात्री करुनच पुढील आवश्यक निधीची मागणी करण्याची दक्षता घेण्यात यावी. पुढील मागणीपत्र प्राप्त झाल्याशिवाय निधी वितरीत केला जाणार नाही याची संबंधित जिल्हा परिषदांनी नोंद घ्यावी. शासनाद्वारे देण्यात येणारे अनुदान लाभार्थ्यांच्या बँक अकाऊंटमध्ये ECS द्वारे प्रदान करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची रक्कम एकत्रितरित्या व Offline पद्धतीने वितरीत करण्यात येऊ नये.

५. या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात आलेल्या लेखानुदानातून होणारा खर्च मागणी क्रमांक वाय-२ "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने (०१)(०७) नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारी वर्ग (अनिवार्य) (२२१५१९१४)" ३६, सहायक अनुदाने (वेतन) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२०-२१ या वित्तीय वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२० / प्र.क्र.६४ / अर्थ-३, दिनांक १६ एप्रिल, २०२० अन्वये विभागांना दिलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहेत. या परिपत्रकान्वये नमूद केलेल्या अटी व शर्तीची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०११०५१३१८०६८१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA,
2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2020.11.05 15:12:37 +05'30'

चेतन निकम

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. विधानसभा / विधान परिषद सदस्य, सर्व
२. विभागीय आयुक्त, सर्व
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे, पालघर, रत्नागिरी, सातारा, सांगली, नांदेड, यवतमाळ
४. सर्व जिल्हा परिषदेचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी, ठाणे, पालघर, रत्नागिरी, सातारा, सांगली, नांदेड, यवतमाळ
५. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, ठाणे, पालघर, रत्नागिरी, सातारा, सांगली, नांदेड, यवतमाळ
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा)
७. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा)
८. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे, पालघर, रत्नागिरी, सातारा, सांगली, नांदेड, यवतमाळ
९. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई
१०. वित्त विभाग, (व्यय-३ व अर्थ-१८)
११. कार्यासन क्रमांक पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१२. निवड नस्ती कार्यासन पापु-२३